विभागीय आयुक्त, नागपूर (२०५३ ०२०६) यांच्या अधिनस्त तहसिल चंद्रपूर जिल्हा चंद्रपूर व अर्जुनी-मोरगाव जिल्हा गोंदिया यांच्या मोटार वाहन अपघात दावे पुर्ती करण्यासाठी "१३- कार्यालयीन खर्च" या उद्दीष्टाखाली पुरवणी मागणीद्वारे मंजूर झालेल्या तरतुदीच्या वितरणाबाबत.

**महाराष्ट्र शासन**

**महसूल व वन विभाग**

**शासन निर्णय क्रमांकः पूरक-२०१८/प्र.क्र.१७०/ई-८**

मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,

मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.

तारीख: ११/०१/२०१९

वाचा -

१) विभागीय आयुक्त यांचे कार्यालय, नागपूर यांचे पत्र क्र.ससंले /बजेट/पुरक/कावि-१२९३/ २०१८, दि.१७.१०.२०१८

२) शासन परिपत्रक, वित्त विभाग क्र.पूरक-२०१८/प्र.क्र.१३५/अर्थ-३, दि.५.१२.२०१८

३) शासन निर्णय, महसूल व वन विभाग क्र.पूरक-२०१८/प्र.क्र.२१९/ब-१, दि.६.१२.२०१८

प्रस्तावना-

विभागीय आयुक्त, नागपूर यांनी त्यांच्या अधिनस्त तहसिल चंद्रपूर जिल्हा चंद्रपूर व अर्जुनी - मोरगाव जिल्हा गोंदिया येथील मोटार वाहन अपघात दावे पुर्ती करण्यासाठी "१३-कार्यालयीन खर्च" या उद्दिष्टाखाली मा. न्यायालयाच्या निर्णयानुसार मोटार वाहन अपघात दाव्याची रक्कम अदा करण्यासाठी सन २०१८-१९ या आर्थिक वर्षासाठी रु. ३२,५०,००० /-लक्ष मागणी केली होती. यासाठी माहे नोव्हेंबर, २०१८ च्या हिवाळी अधिवेशनात मंजूर झालेल्या रुपये रु. ३२,५०,००० /-इतक्या पुरवणी मागणीची रक्कम वितरित करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन आहे.

शासन निर्णय-

विभागीय आयुक्त, नागपूर यांना त्यांच्या अधिनस्त तहसिल चंद्रपूर जिल्हा चंद्रपूर व अर्जुनी - मोरगाव जिल्हा गोंदिया येथील मोटार वाहन अपघात दावे पुर्ती करण्यासाठी "१३-कार्यालयीन खर्च" या उद्दिष्टाखाली मा. न्यायालयाच्या निर्णयानुसार मोटार वाहन अपघात दाव्याची रक्कम अदा करण्यासाठी सन २०१८-१९ या आर्थिक वर्षासाठी रु. ३२,५०,००० /- (रुपये बत्तीस लक्ष पन्नास हजार फक्त) निधी उपलब्ध करुन देण्यात येत आहे. वित्त विभागाच्या संदर्भ क्र.२ येथील परिपत्रकान्वये मंजूर पुरवणी मागणीची रक्कम बीम्सद्वारे वितरित करण्यास संमती देण्यात येत आहे.

२. या रकमेचा खर्च खालील लेखाशिर्षाखाली माहे नोव्हेंबर-२०१८ च्या पावसाळी अधिवेशनात पुरवणी मागणीद्वारे मंजूर करण्यात आलेल्या तरतुदीनुसार भागविण्यात यावा:-

| | |
|---|---|
| मागणी क्रमांक | सी-१ |
| मुख्य/गौण/उपशिर्ष | २०५३, जिल्हा प्रशासन<br>००,<br>०९४, इतर आस्थापना,<br>(०१)उपविभागीय आस्थापना<br>(०१)(०५) आयुक्त, नागपूर, (अनिवार्य)<br>१३-कार्यालयीन खर्च |

३. उपरोक्त वितरित निधी अर्थसंकल्पीय प्रणालीवर (BEAMS) वितरित करण्याची कार्यवाही वित्त विभागाशी समन्वय साधून अर्थसंकल्प कार्यासनाने (ब-१) त्वरित करावी.

४. सदर शासन निर्णय वित्त विभागाने अनौपचारिक संदर्भ क्र.४६८/२०१८/व्यय-९, दि.२०/१२/२०१८ अन्वये दिलेल्या सहमतीने निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१९०११११३०२१९४४१९ असा आहे. हा शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Nilkanth Pandurang Awhad

Digitally signed by Nilkanth Pandurang Awhad
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Revenue And Forest Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=e42a88b7548c3a7d48b7a77d85de3524cf8f2e7e0f87091223ad803d4d4a2a31, cn=Nilkanth Pandurang Awhad
Date: 2019.01.11 13:11:17 +05'30'

**( नि.पां.आव्हाड )**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१. विभागीय आयुक्त, नागपूर .
२. जिल्हाधिकारी, चंद्रपूर व गोंदिया
३. महालेखापाल ( लेखा व अनुज्ञेयता ) महाराष्ट्र राज्य, मुंबई-१, नागपूर-२.
४. महालेखापाल ( लेखा परीक्षा ) महाराष्ट्र राज्य, मुंबई-१, नागपूर-२.
५. जिल्हा कोषागार अधिकारी, चंद्रपूर व गोंदिया
६. वित्त विभाग, कार्यासन व्यय-९, अर्थसंकल्प-६, मंत्रालय, मुंबई-३२.
७. महसूल व वन विभाग, कक्ष अधिकारी ब-१/पीएसी, मंत्रालय, मुंबई ३२.
८. निवडनस्ती ई-८, कार्यासन, महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.

* * *